**राज्य योजनांतर्गत योजना**
**१६-वनस्थानकांचे बांधकाम या योजने अंतर्गत**
**सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात अनुदान**
**उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. टिआरएस-०४/२०१६/प्र.क्र.१०४/फ-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ मार्च, २०१७

**पहा :-** १. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२७/२२९/२०१६-१७ दिनांक ६.५.२०१६
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६
३. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. टिआरएस-०४/२०१६/प्र.क्र.१०४/फ-६, दिनांक ११.५.२०१६ व दिनांक २.७.२०१६
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक ८.२.२०१७

**शासन निर्णय :-**

वनक्षेत्राचे संरक्षण, अवैध वृक्षतोड रोखणे, अवैध तोड झालेल्या मालाची बेकायदेशीर वाहतूक, वन्यजीवांची अवैध शिकार व व्यापार यावर नियंत्रण ठेवणे, वनसंपत्तीचे जतन करणे, वनातील घडणाऱ्या अवैध बाबीवर तसेच आगीच्या मौसमात लागणाऱ्या वणव्यावर नियंत्रण ठेवणे, अवैध चराई, अतिक्रमणावर नियंत्रण ठेवणे यासर्व बाबींचा विचार करुन वनसंरक्षण कुटीचे बांधकाम, कुटीजवळ बोरवेलचे काम इत्यादी प्रस्तावित कामास आवश्यक असलेला नियतव्यय वार्षिक योजना सन २०१६-२०१७ मध्ये राज्य योजनेतंर्गत १६-वनस्थानकांचे बांधकाम या योजनेचा रु. १३०.०० लक्ष एवढया रकमेचा सन २०१६-२०१७ चा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. या योजने अंतर्गत सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षासाठी रु.१३०.०० लक्षची तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित रक्कम रु.१३०.०० लक्ष रकमेच्या ८०% च्या मर्यादेत रु.१०४.०० लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास उपरोक्त संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयांनुसार मान्यता देण्यात आली आहे. आता वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ४ येथील दिनांक ८.२.२०१७ रोजीच्या परिपत्रकानुसार, योजनांतर्गत योजनेतील (०२) मजूरी या उदिष्टातंर्गत आता १००% निधी वितरणास उपलब्ध करुन दिला आहे.

सदरहु योजनेमध्ये (०२) मजूरी या उद्दिष्टांतर्गत रु.५२.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये रु.४१.६० लक्ष इतका निधी (०२) मजूरी या उद्दिष्टांतर्गत वितरित करण्यात आला आहे.

त्यानुषंगाने एकूण उपलब्ध रु.५२.०० लक्ष मधून वजा वितरित केलेली रक्कम रु.४१.६० लक्ष म्हणजे उर्वरीत रु.१०.४० लक्ष इतका निधी मंजूर करुन अर्थसंकल्पीत वितरण प्रणालीद्वारे (BDS) वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सदर योजनेवर होणारा खर्च हा खर्च प्रधानशीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१ वनीकरण १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (३१) वनस्थानकाचे बांधकाम, राज्य योजनाअंतर्गत योजना (२४०६ २१८८), या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक ८.२.२०१७ च्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१२३९०३७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.30 12:41:05 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सहसचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर (५ प्रती)
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व (२ प्रती)
५) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई (२ प्रती)
६) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई (२ प्रती)
७) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर (२ प्रती)
८) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर (२ प्रती)
९) जिल्हा कोषागार अधिकारी- अमरावती, गडचिरोली, नागपूर, चंद्रपूर, औरंगाबाद, पुणे, कोल्हापूर, नाशिक, ठाणे, यवतमाळ.
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना विनंती करण्यात येते की, नमूद शासन निर्णयानुसार रक्कम वितरित करण्यात यावी.
११) कार्यासन अधिकारी फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) फ-६, कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.